बृहन्मुंबईतील खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्यांचे प्रदान मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेमार्फत करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग,**
**शासन निर्णय क्र. वेतन १२१६/प्र.क्र. ३९/१६/टीएनटी-३**
**मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२**
**दिनांक :- ३ जुन, २०१७**

**संदर्भ :-**

१ शालेय शिक्षण शासन निर्णय क्र. एसएसएन -१८६७/७६१४२-जी, दिनांक २९ मे १९७३

२ शासन निर्णय वित्त विभाग क्र. डी.डी.ओ.-१००५/प्र.क्र.५/कोषा-प्रशा-५, दिनांक २९ ऑगस्ट, २००५

३ शासन निर्णय वित्त विभाग क्र.डी.डी.ओ. १००५/प्र.क्र.६२/कोषा-प्रशा-५, दिनांक ७ एप्रिल, २००८

४ शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, क्र. एसएसएन-१००७/(७७/०७)/ माशि-२, दिनांक ५ ऑक्टोबर, २०११

५ शासन निर्णय , शालेय शिक्षण विभाग क्र. एसएसएन-१००७/७७/१२/माशि-२, दिनांक ३ ऑगस्ट, २०१२

६ शासन शुध्दीपत्रक , शालेय शिक्षण विभाग क्र. एसएसएन-१००७/७७/०७/माशि-२, दिनांक ३१ ऑगस्ट, २०१२

७ शासन निर्णय, शालेय शिक्षण विभाग क्र. एसएसएन-१००७/७७/०७/माशि-२, दिनांक ३१ ऑगस्ट, २०१२

**प्रस्तावना :-**

राज्यातील मान्यताप्राप्त अनुदानित - विना अनुदानित खाजगी प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांमधील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन व भत्त्यांचे प्रदान जिल्हा मध्यवर्ती बँका अथवा राष्ट्रीयकृत बँकेमार्फत करण्यात येते. मुंबई व मुंबई उपनगरामध्ये शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन सध्या युनियन बँक ऑफ इंडिया या राष्ट्रीयकृत बँकेमार्फत करण्यात येते. मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेने शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन त्यांचे मार्फत करण्याची विनंती केली आहे. राज्यातील सहकार चळवळीस बळकटी मिळण्याच्या दृष्टीने व मुंबई जिल्हा मध्यवर्ती बँकसुध्दा राष्ट्रीयकृत बँकाप्रमाणे संगणकीय प्रणालीद्वारे कारभार चालविण्यात येत असल्याने शालेय शिक्षण विभागातंर्गत बृहन्मुंबईतील खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांतील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेमार्फत अदा करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

बृहन्मुंबईतील खाजगी अनुदानित प्राथमिक, माध्यमिक व उच्च माध्यमिक शाळांतील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन युनियन बँक ऑफ इंडिया मार्फत अदा करण्याबाबत दिनांक ५ ऑक्टोबर, २०११ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आलेला निर्णय रद्द करण्यात येत आहे. बृहन्मुंबईतील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन युनियन बँक ऑफ इंडिया या बँकेऐवजी **मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी** बँकेमार्फत अदा करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे

१. बृहन्मुंबईतील शिक्षक / शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांचे वेतन अदा करण्याबाबत वित्त विभागाने संदर्भ क्र. २ व ३ येथील शासन निर्णयान्वये विहीत केलेली कार्यपध्दती व इतर अटी व शर्ती जशाच्या तशा लागू असतील. सदर अटी व शर्तीची काटेकोरपणे अंमलबजावणी मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेने करावी.
२. सदर निर्णयाची अंमलबजावणी दिनांक १.७.२०१७ पासून अंमलात येईल. याबाबत काही अडचणी असल्यास त्याबाबत संचालक, लेखा व कोषागारे व विभागीय उपसंचालक, लेखा व कोषागारे यांची मदत घेण्यात यावी.
३. विभागीय शिक्षण उपसंचालक, मुंबई विभाग, मुंबई यांनी याबाबत मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी बँकेशी आवश्यक तो करारनामा तात्काळ करण्याची कार्यवाही करावी.
४. याबाबत शिक्षण निरीक्षक (दक्षिण /उत्तर/पश्चिम), मुंबई यांचे मेन पूल अकाउंट (पार्कींग अकाउंट) **मुंबई जिल्हा मध्यवर्ती सहकारी** बँकेत तात्काळ उघडण्यात यावे.

याबाबत आवश्यक संनियत्रण करण्याची कार्यवाही आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६०३१५५२४८५५२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2017.06.03 15:50:46 +05'30'

(राजेंद्र पवार)
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१ मा. मंत्री (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग) यांचे खाजगी सचिव
२ आयुक्त, शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३ महालेखापाल (लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई
४ महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई
५ संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई
६ सह संचालक (सुधारणा), संचालनालय, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई

७ शिक्षण संचालक (प्राथमिक / माध्यमिक व उच्च माध्य ), महाराष्ट्र राज्य, पुणे
८ विभागीय शिक्षण उप संचालक, मुंबई विभाग, मुंबई
९ शिक्षण निरीक्षक (उत्तर/दक्षिण/पश्चिम ), मुंबई
१० अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
११ सर्व कार्यासने, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२ निवड नस्ती, टीएनटी/३, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई